कोल्हापूर जिल्ह्यातील करवीर, राधानगरी, भुदरगड व आजरा तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.१४७/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- २४ ऑक्टोबर, २०१८

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्र.मुअ(पुणे)/का-२/रेशा/६०/३७५३/२०१८ दि. २१/०५/२०१८.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र मुअ(पुणे)/का-२/रेशा/६२/५८३५/२०१८ दि. ०१/०९/२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भाधिन पत्रान्वये कोल्हापूर जिल्ह्यातील करवीर, राधानगरी, भुदरगड व आजरा तालुक्यातून जाणारे तीन रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत व तीन रस्ते लगतच्या प्रमुख जिल्हा मार्ग रस्त्यामध्ये समाविष्ट करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, कोल्हापूर यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, लोकसंख्या तसेच रस्त्यांचा एकुण होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, कोल्हापूर यांचा ठराव विचारात घेता सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, कोल्हापूर यांचा ठराव विचारात घेऊन कोल्हापूर जिल्ह्यातील खालील रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | समाविष्ठ रस्त्यांचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी (कि.मी.) | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | प्र.जि.मा.-४१ पासून चक्रेश्वरवाडी बारडवाडी ढेरेवाडी ठिकपूर्ली ते रा.मा.क्र.१८९ रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ५९ | (०/०० ते ११/५००) ११.५०० कि.मी. | ११.५०० | प्रमुख जिल्हा मार्ग-९७ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २. | रा.मा. १७८ पासून सरवडे - मालवे - तुरंबे - तळाशी - माजगांव - ठिकपुर्ली रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ६० | (०/०० ते १०/६००) १०.६०० कि.मी. | १०.६०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-९८ |
| ३. | रा.मा.१८९ पासून मडिलगे बु. - गंगापूर - पळशिवणे - देसाईवाडी - पाल ते रा.मा.१८९ रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १०१ | (०/०० ते ३/००) ३.०० कि.मी. | १४.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-९९ |
| | | इतर जिल्हा मार्ग ९९ | (३/०० ते ८/००) ५.०० कि.मी. | | |
| | | ग्रामीण मार्ग ६८ | (०/०० ते ६/००) ६.०० कि.मी. | | |
| | **एकूण** | | | **३६.१०० कि.मी.** | |

तसेच खालील ३ रस्ते दर्जोन्नत करून लगतच्या प्रमुख जिल्हा मार्ग मध्ये सामाविष्ट करण्यात आहे.

| **अ. क्र.** | **रस्ते विकास योजना २००१-२१ नुसार अस्तित्वातील रस्ता** | **रस्ता क्रमांक** | **समावेश करावयाचा रस्ता** | **साखळी क्रमांक व लांबी (कि.मी.)** | **रस्त्याचे अंतिम नामाभिधान** |
|---|---|---|---|---|---|
| १. | प्रमुख जिल्हा मार्ग-२९ पासून आरे - सडोली खा.- हिरवडे - हसूर दुमाला - राशीवडे बु.- शिरगांव (प्रमुख जिल्हा मार्ग - २९) रस्ता. (२२.८५० कि.मी.) | प्रमुख जिल्हा मार्ग ३५ | शिरगांव-आमजाई व्हरवडे (राज्यमार्ग-१९७) रस्ता. (इतर जिल्हा मार्ग-५८) | (०/००ते १/५०) (१.५०० कि.मी.) | प्रमुख जिल्हा मार्ग-२९ पासून आरे - सडोली खा. - हिरवडे - हसूर दुमाला - राशीवडे बु.- शिरगांव -आमजाई व्हरवडे ते राज्यमार्ग-१९७ रस्ता. प्रमुख जिल्हा मार्ग-३५ (२४.३५० कि.मी.) |
| २. | राज्यमार्ग-१८८ पासून भादवण- पेंद्रेवाडी-कोवाडे-मलिंगे-कागीनवाडी प्रमुख जिल्हा मार्ग -६२ ला मिळणारा रस्ता. (१७.५०० कि.मी.) | प्रमुख जिल्हा मार्ग ८२ | कोळींद्रे - पोश्रातवाडी ते प्रमुख जिल्हा मार्ग-६१ रस्ता. (ग्रामीण मार्ग-१०३) | (०/००ते २/४०) (२.४० कि.मी.) | राज्यमार्ग-१८८ पासून भादवण - पेंद्रेवाडी - कोवाडे - मलिंगे - कागीनवाडी - कोळींद्रे पोश्रातवाडी ते प्रमुख जिल्हा मार्ग -६१ रस्ता. प्रमुख जिल्हा मार्ग-८२ (१९.९०० कि.मी. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३. | राज्यमार्ग-१८८ पासून बेळकुंदी - इंचनाळ - हारूर ते राज्यमार्ग- २०१ रस्ता. (८.५०० कि.मी.) | प्रमुख जिल्हा मार्ग ८३ | राज्यमार्ग-२०१ ते सरंबळवाडी रस्ता. (ग्रामीण मार्ग -१०६) | (०/००ते १/५०) (१.५०० कि.मी.) | राज्यमार्ग- १८८ पासून बेळकुंदी - इंचनाळ - हारूर ते राज्यमार्ग-२०१ रस्ता. प्रमुख जिल्हा मार्ग-८३ (१२.१०० कि.मी.) |
| | | | सरंबळवाडी ते प्रमुख जिल्हा मार्ग -८२ ला मिळणारा रस्ता. (ग्रामीण मार्ग -७९) | (०/००ते २/१०) (२.१०० कि.मी.) | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील कोल्हापूर जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **४३.६००** कि.मी. ने वाढ होवून एकूण लांबी (१७१७.९०० + ४३.६००) म्हणजेच **१७६१.५०० कि.मी.** इतकी व **इतर जिल्हा मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **३१.६०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (१९०६.२०५ - ३१.६००) म्हणजेच **१८७४.६०५ कि. मी.** इतकी आणि तसेच ग्रामीण मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत **१२.०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (४४१२.६८२ - १२.००) म्हणजेच ४४००.६८२ कि. मी. इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८१०२४१६१३२५३५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2018.10.24 16:18:58 +05'30'

**( प्रशांत पाटील )**
अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) जिल्हाधिकारी,कोल्हापूर.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर.
५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, कोल्हापूर (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
९) निवडनस्ती.